**महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेंतर्गत वन निवासी अनुसूचित जमातींना अतिरिक्त ५० दिवस रोजगार देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः मग्रारो-२०१४/ प्र.क्र.९१/रोहयो -१०अ**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २८ ऑक्टोबर, २०१४

**वाचा :**

केंद्रिय ग्रामीण विकास मंत्रालय, नवी दिल्ली यांचे क्र. जे ११०११/१/२००९- नरेगा (टीएफ) (भाग) (३१८६४) दिनांक ३.६.२०१४ चे इंग्रजी पत्र.

**परिपत्रक**

महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी अधिनियम २००५ अंतर्गत मग्रारोहयोच्या अंमलबजावणीकरिता शासनाने वेळोवेळी मार्गदर्शक सूचना निर्गमित केलेल्या आहेत.

महाराष्ट्र रोजगार हमी अधिनियम, १९७७ (सुधारणा २००६) अन्वये मग्रारोहयो अंतर्गत ग्रामीण कुटूंबांना वित्तीय वर्षात १०० दिवस अकुशल रोजगार देण्याची तरतूद आहे.

केंद्रीय पर्यावरण व वने मंत्रालय आणि आदिवासी मंत्रालय यांच्या राष्ट्रीय संयुक्त समितीने वन कायदा २००६ अंमलात आणण्याच्या दृष्टीने मग्रारोहयो अंतर्गत सध्या १०० दिवस रोजगार देण्याची जी तरतूद आहे ती वन निवासी अनुसूचित जमातींसाठी १५० दिवस (अतिरिक्त ५० दिवस) करावी अशी शिफारस केंद्र शासनास केलेली आहे.

केंद्र शासनाने राष्ट्रीय संयुक्त समितीने केलेली शिफारस स्वीकारली असून त्यानुसार वन निवासी अनुसूचित जमातींना अतिरिक्त ५० दिवस रोजगार खालील अटींचे अधीन राहून त्यास मान्यता दिलेली आहे.

१) सदर लाभार्थी यांच्याकडे खाजगी जमिन असता कामा नये.
२) आर्थिक वर्षात सदर लाभार्थ्याने महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजने अंतर्गत कामाचे १००दिवस काम पूर्ण करणे आवश्यक आहे.
३) तसेच सदर लाभार्थ्यांच्या जॉब कार्ड वर दिलेल्या नमुन्याप्रमाणे (प्रपत्र अ) २ X २ इंचाचा रबर स्टॅम्प चा शिक्का मारावा.

उपरोक्त आदेशाची अंमलबजावणी आपल्या जिल्हयात तात्काळ करावी व त्यानुसार कार्यवाही करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१०२८१६३२०९८३१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

KALE VIVEKANANDA P

Digitally signed by KALE VIVEKANANDA P
DN: c=IN, o=Goverment of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=KALE VIVEKANANDA P
Date: 2014.11.01 15:54:11 +05'30'

(वि. पु. काळे)
अवरसचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) मा. राज्यपाल यांचे खाजगी सचिव,
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधानसचिव, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
३) मा. मंत्री (रोहयो) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
४) मा. राज्यमंत्री (रोहयो) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
५) मा. मुख्यसचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई,
६) सर्व अतिरिक्त मुख्यसचिव/प्रधानसचिव/सचिव, मंत्रालयीन विभाग,
७) महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय,
८) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई,
९) संचालक भुजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे,
१०) सर्व विभागीय आयुक्त,
११) आयुक्त नरेगा, नागपूर,
१२) सर्व जिल्हाधिकारी,
१३) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
१४) सर्व उप आयुक्त (विकास),
१५) उपसचिव तथा प्रकल्प संचालक, सुधारणा सहाय्य व प्रकल्प व्यवस्थापन,
१६) सर्व उपमुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
१७) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग ,
१८) सर्व कार्यासन अधिकारी, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१९) निवड नस्ती, कार्यासन मग्रारो १० अ.